# वाचायला शिकायचे तर वाचलेच पाहिजे!

## अरविंद गुप्ता

मराठी - मानसी महाजन

जगभरातले अब्जावधी लोक अनेकविध पद्धतीने वाचन शिकतात - कोणी फोनेटिक पद्धतीने अक्षराचे आवाज ऐकून, तर कोणी पूर्ण वाक्य (whole sentence approach) डोळ्यासमोर ठेऊन. बहुसंख्य मुलांना इंग्रजीची ओळख ही 'बा बा ब्लॅक शीप', किंवा 'रिंग अ रिंग अ रोझेस' अश्या निरर्थक बडबडगीतांमधून होते. या कवितांचा मुलांच्या भोवतालाशी शून्य संबंध असतो, आणि या कवितांचे मूळ संदर्भही अनेकदा भेसूर, भयानक असतात. मुलांना वाचनाची गोडी लावायची असेल तर यापेक्षा जास्त अनुकूल पद्धती असू शकते का?

अनेक मुलांना औपचारिक पद्धतीचा अभ्यास, शैक्षणिक साहित्य आणि पुनरुक्तीवर भर देऊन केलेला - बरेच वेळा निरर्थक - वाचन सराव यातून वाचन शिकणे खूप कठीण जाते. या पद्धतीच्या 'programmatic' शिक्षणामागचे तत्वज्ञान सांगते की वाचन हा अश्या कौशल्यांचा संग्रह आहे, जी पूर्वनिर्धारित क्रमानुसार टप्प्या टप्प्याने, प्रत्येक टप्प्याला योग्य प्रकारे चाचणी घेत शिकवता येतात. 'Programmatic' सूचनापद्धती मुळातच शिक्षक आणि मुलांच्या अर्थपूर्ण भाषा अनुभवाच्या विरोधात आहे. ही पद्धती मुलांवर आणि त्यांच्या शिक्षणावर नियंत्रण ठेवण्याचे तंत्र आहे.

फ्रँक स्मिथ यांनी त्यांच्या 'रीडिंग' या प्रसिद्ध पुस्तकात वाचनाच्या प्रक्रियेवर प्रकाश टाकला आहे. त्यांनी मुलांसाठी 'साक्षरता कट्टा' सुरु करण्याचा प्रस्ताव मांडला, ज्यामध्ये सहभागी होऊन मुले मनापासून वाचनाचा आनंद घेऊ शकतील. फ्रँक स्मिथ यांच्या विश्लेषणामागे वरवर सोपे वाटणारे सत्य आहे - मुले केवळ वाचनातूनच वाचन शिकू शकतात! पाट्या, शिक्के, याद्या, वर्तमानपत्रे, मासिके आणि पुस्तके रोजच्या व्यवहारात वापरणाऱ्या व्यक्तींचा सहवास मिळाला की मुले अगदी सहज रित्या वाचती आणि साक्षर होतात याचा स्मिथ यांना प्रत्यय आला.

### अर्थ लावणे

प्रसिद्ध अमेरिकन शिक्षणतज्ज्ञ जॉन होल्ट यांनी एक खूप बोलका किस्सा सांगितला आहे. कृष्णवर्णीय आफ्रिकन मुलांसाठी असलेल्या एका शाळेतील मुलांना शैक्षणिक पाठ्यपुस्तकांमध्ये अजिबात रस वाटत नव्हता. मुलांना मुळात पुस्तकातच रस नसल्यामुळे शिक्षकाला मुलांकडून ती पुस्तके बळजबरीने सुद्धा वाचून घेणे शक्य नव्हते. अनेक शिक्षकांनी प्रस्थापित पद्धतीनुसार वाचनासाठी प्रयोग केले आणि हार पत्करली. एका तरुण शिक्षिकेने मात्र ही परिस्थिती आमूलाग्र बदलून टाकली. शिक्षकी पेशात नवीनच रुजू झालेली ही शिक्षिका मुलांना वाचनाची गोडी लावण्यासाठी नाविन्यपूर्ण पद्धतीच्या शोधात होती. तिच्या लवकरच लक्षात आले, की मुलांना त्या कोरड्या कंटाळवाण्या पाठ्यपुस्तकांमध्ये अजिबात रस नाही आहे.

वर्गात मुख्यतः गरीब कृष्णवर्णीय मुले होती. बहुसंख्य मुलांनी एकदाही पुस्तक वाचलेले, अगदी हाताळलेले सुद्धा नव्हते, पण त्यांच्या आयुष्यात संगीत होते. शिक्षिकेने एक सोपी युक्ती लढवली. मुलांना माहित असलेली, मुले म्हणत असलेली प्रसिद्ध गाणी तिने तख्त्यांवर मोठ्या अक्षरात लिहून वर्गात दर्शनीय जागी भिंतींवर लटकवून ठेवली. मुलांना गाणी आधीच तोंडपाठ असल्यामुळे मुले लगेच ती 'वाचू' लागली. आयुष्यात प्रथमच लिहिलेल्या शब्दाला मुलांच्या दृष्टीने 'अर्थ' होता. तख्त्यावर खरडलेल्या त्या रेषा मुलांचे आयुष्य, दुःख, स्वप्न सांगत होत्या. मुलांना ह्यामध्ये खूप रस वाटला. ह्या अनुभवानंतर त्यांची वाचनाची गाडी मार्गाला लागली.

## संदर्भ आणि समर्पकता

संदर्भ आणि समर्पकता म्हणजे काय? अनेकदा अभ्यासक्रम शिकणाऱ्याच्या भोवतालापासून इतका निराळा असतो, की त्या अभ्यासक्रमामधून शिकणाऱ्याला काहीच बोध होत नाही. भारतात भरभरून उपलब्ध असणाऱ्या 'प्रौढ-शिक्षण' साहित्यात याचे अनेक पुरावे सापडतात. हे साहित्य शिकणाऱ्याच्या आयुष्यातील संदर्भांपासून अगदी विभक्त असते. प्रौढ शिक्षण वर्गांची लाट भारतात विशेष यशस्वी न होता ओसरली यात काहीच नवल नाही. प्रौढ शिक्षण साहित्यातील भाषा अशिक्षित, गरीब आणि शोषित समाजाच्या वास्तवाच्या विरोधात ठासून भरलेली आहे. उदाहरणार्थ, कबुतरातील 'क' ऐवजी कर्जातील 'क' या समाजाला अधिक आपला वाटू शकतो. तसेच सरस्वतीतला 'स' शिकण्याच्या ऐवजी सावकारातला 'स' शोषित जनतेला अधिक चांगला समजू शकेल.

सिल्विया ऍश्टन वॉर्नर त्यांच्या प्रसिद्ध पुस्तकात, 'स्पिन्स्टर' मध्ये लिहितात - "वाचणे, शिकवणे ह्या किती धोकादायक क्रिया आहेत! परक्या गोष्टींचे लेपावर लेप चढवणे! स्वतःच्या आत इतके काही असताना कृत्रिम परक्या लेपाची काय गरज? आत किती गोष्टी बंद आहेत! त्याच बाहेर काढून शिक्षण साहित्य म्हणून वापरता आल्या तर! आणि त्यावरून काही नवे तयारही नाही करायचे, जे आहे तेच जरी अलगद स्पर्शिले तरी ते स्व-ऊर्जेने ज्वालामुखीप्रमाणे बाहेर उसळेल. "

सिल्विया न्यूझीलंडच्या माओरी मुलांना वाचन शिकवत होती. वर्गातील सर्व ओळखीच्या वस्तूंवर तिने नावांच्या चिट्ठ्या लिहून ठेवल्या. 'पंखा', 'बाक', 'फळा', 'दार' अश्या चिट्ठ्या त्या त्या वस्तूंवर दिसतील अशा चिकटवल्या. मुले त्या चिट्ठ्या पाहत, वाचत आणि त्यांच्याशी मैत्री करत. सिल्विया मुलांना त्यांचे अनुभव सांगायला प्रोत्साहन देत असे. ते अनुभव मुलांच्याच शब्दात लिहून ठेवत. ह्या मुलांच्याच गोष्टी असल्यामुळे मुलांना त्या वाचायला खूप मजा येत असे. मुले त्या गोष्टींची चित्रे काढत. फक्त एका शैक्षणिक सत्रात न्यूझीलंड मधल्या एका छोट्या खेड्यातल्या ह्या आदिवासी शाळेने मुलांची ६० पुस्तके, चित्रांसकट प्रकाशित केली. प्रत्येक पुस्तकात मुलांच्या अनुभवांची नोंद होती, थोडक्यात त्यांच्या भावविश्वाची नक्षी होती.

याच पद्धतीचा वापर करत पाउलो फ्रेरी ब्राझील मधील गरीब शेतकऱ्यांशी त्यांच्या परिस्थितीबद्दल, समस्यांबद्दल बोलू लागले. त्यांच्यासाठी महत्वाचे असलेले शब्द त्यांना लिहून वाचून दाखवू लागले. पाउलो फ्रेरी यांनी केवळ ३०

तासात ह्या गरीब आणि निराश शेतकऱ्यांना स्वतंत्रपणे वाचायला शिकवले. या प्रक्रियेतून शेतकरी त्यांच्यावर होत असलेल्या अत्याचारांच्या मुळाशी सुद्धा पोहोचू शकले.

**शब्दतून जग!**

गिजूभाई बधेका गांधीजींचे समकालीन होते. त्यांनी २४ वर्षे गुजराथ येथील भावनगर मध्ये मुलांसाठी सर्जनशील आणि प्रयोगशील शाळा चालवली. ते मुलांना रोज एक गोष्ट सांगत, ज्यातून मुलांना गोष्टींची गोडी लागत आणि वेगवेगळ्या गोष्टी ऐकण्यासाठी ती आतूर होत. दुपारी मुले त्या गोष्टींची नाटके बसवत. लवकरच मुलांचे भाषेवर प्रभुत्व एवढे वाढले, की संवाद पाठ करण्याची गरजच उरली नाही. जर एखादा संवाद आठवला नाही तर मुले स्वतः वाक्ये तयार करून बोलू लागत. गिजूभाईंच्या मते प्रत्येक मुलाला सारखेच, शासन-संमत पाठ्यपुस्तक देणे मूर्खपणाचे आणि अतार्किक होते. "५० मुलांनी तेच पुस्तक घेण्यात काय अर्थ आहे?" ते म्हणत. त्यामुळे गिजुभाई नवीन शालेय वर्ष सुरु झाले की मुलांना पाठयपुस्तके घेण्याऐवजी ते पैसे गोष्टीची पुस्तके घेण्यासाठी द्यावे असे सुचवत. १९२० साली गिजुभाईंनी पाठ्यपुस्तके बाजूला सारून प्रत्येक मुलासाठी तीन वेगवेगळी गोष्टीची पुस्तके विकत घेतली. सचित्र पुस्तकांच्या या संग्रहातून त्यांनी वर्गात वाचनालय सुरु केले. मुलांच्या पैश्यातून उभे केलेले वाचनालय - युनिसेफ, प्रथम किंवा वर्ल्ड बँकने दान म्हणून दिलेले नाही. तीन पाठ्यपुस्तके वाचण्याऐवजी मुले आता शंभरावर रंगीत सचित्र पुस्तके वाचू शकत होती. गिजुभाईंची ही "शब्दातून जग" मिळवण्याची पुरोगामी दृष्टी स्वातंत्र्यानंतर काही मोजक्या शाळांनी प्रत्यक्षात उतरवली आहे.